आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी करून राज्याचे नाव उज्जवल केलेल्या खेळाडूंना व त्यांच्या मार्गदर्शकांना प्रोत्साहनपर बक्षिसे देऊन गौरविण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राक्रीधो-२०२४/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२
दिनांक : ०१ जुलै, २०२४

**वाचा:** १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२०१२/प्र.क्र.१५८/ क्रीयुसे-२ , दिनांक ०५ फेब्रुवारी, २०१४

२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२०१८/प्र.क्र.१०३/ क्रीयुसे-२, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१८

**प्रस्तावना :-**

आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी करून राज्याचे नाव उज्जवल केलेल्या खेळाडूंना व त्यांच्या मार्गदर्शकांना प्रोत्साहनपर बक्षिसे देऊन गौरविण्याची योजना शासनाच्या उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार कार्यान्वित करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील परिशिष्ट-अ मधील नियम क्र.०३ नुसार पुरस्काराचे स्वरूप निश्चित करण्यात आले आहे. यामध्ये नमूद स्पर्धेतील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना रोख बक्षीस देवून गौरविण्यात येते. तद्नंतर शासनाच्या उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये उपरोक्त नमूद परिशिष्ट अ मधील नियम क्रमांक ४, पात्रतेच्या निकषांमध्ये नवीन नियमांचा समावेश करण्यात आला आहे. सदर निकषामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयातील परिशिष्ट “अ” मधील नियम क्र.४, पात्रतेच्या निकषांमधील अ.क्र.(iv) खालीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहेत-

(iv) उपरोक्त सर्व स्पर्धेतील सांघिक स्पर्धा असल्यास आठ देशाचे संघ असणे आवश्यक आहे. तसेच वैयक्तिक क्रीडा प्रकारात आठ देशांचे खेळाडू संबंधित खेळ प्रकाराच्या स्पर्धेत/वयोगटात सहभागी असणे आवश्यक आहे. तथापि, ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा, आशियाई क्रीडा स्पर्धा तसेच कॉमनवेल्थ क्रीडा स्पर्धा या स्पर्धांमध्ये सहभागी खेळाडूंना प्रोत्साहनपर बक्षीस रक्कम देताना सांघिक/वैयक्तिक क्रीडा प्रकारात किमान सहभागी संघांची/देशाची अट आवश्यक असणार नाही.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०७०११६१९२७३४२१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2024.07.01 16:30:34 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
(२) मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
(३) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
(४) मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे खाजगी सचिव,
(५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
(६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
(७) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
(८) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
(९) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे,
(१०) सर्व उप संचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
(११) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
(१२) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे,
(१३) निवड नस्ती (क्रीयुसे-२).